182/29

**प्रारुप विकास योजना - शिर्डी (वा.क्षे.)**
महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम १६२ अन्वये अधिकारी नियुक्त करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.टिपीएस-१६१०/५७१/प्र.क्र. ८७/१०/नवि-९,**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२,**
**दिनांक : २६ एप्रिल, २०१०.**

**पहा:-** संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. वि.यो.शिर्डी (वा.ह.)/कलम २६/१६२-अधिकारी/टिपीव्ही-४/५९६, दि. ७ जानेवारी, २०१०.

**शासन निर्णय:-** सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या असाधारण राजपत्रात प्रसिध्द करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(प्रदीप गोहिल)**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) संचालक, नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) जिल्हाधिकारी, अहमदनगर.
३) उप सचिव (नगररचना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) उपसंचालक, नगररचना, नाशिक विभाग, नाशिक.
५) सहायक संचालक नगर रचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर.
६) मुख्याधिकारी, शिर्डी नगर पंचायत, जिल्हा अहमदनगर.
७) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, पुणे.

(त्यांना विनंती की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या असाधारण राजपत्रात नाशिक विभागीय पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिध्द करुन त्याच्या प्रत्येकी ५ प्रती हया विभागास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठवाव्यात.)

८) कक्ष अधिकारी, कार्यासन नवि-२९,

(त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची अधिसुचना विभागाच्या वेब साईटवर ठेवावी.)

९) निवडनस्ती (कार्यासन नवि-९)

Gondiya 162

प्रारुप विकास योजना - शिर्डी (वा.क्षे.)
महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम १६२ (१) अन्वये अधिकारी नियुक्त करणेबाबत...

## अधिसूचना
## महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ एप्रिल, २०१०

*महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६*

**क्र. :टिपीएस-१६१०/५७१/प्र.क्र.८७/१०/नवि-९:** ज्याअर्थी शिर्डी नगर पंचायतीने (जिल्हा अहमदनगर) [यापुढे "उक्त नियोजन प्राधिकरण" असे उल्लेखिलेले] दिनांक २२ डिसेंबर, १९९८ रोजी, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ चे [सन १९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७] [यापुढे "उक्त अधिनियम" असे उल्लेखिलेला] कलम २३ (१) आणि ३८ मधील तरतुदीनुसार, शिर्डी नगर पंचायतीच्या वाढीव हद्दीची विकास योजना तयार करण्याचा [यापुढे "उक्त प्रारुप विकास योजना" असे उल्लेखिलेली] इरादा जाहीर करुन त्याबाबतची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात, नाशिक विभागीय पुरवणी, भाग-१ अ मध्ये दिनांक ६ सप्टेंबर, २००१ रोजी प्रसिद्ध केली आहे;

आणि ज्या अर्थी, उक्त अधिनियमाचे कलम २६ (१) नुसार उक्त नियोजन प्राधिकरणाने, उक्त प्रारुप विकास योजना तयार करण्याचा इरादा जाहीर करुन त्याबाबतची अधिसूचना राजपत्रात प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून २ वर्षापेक्षा अधिक नसेल अशा मुदतीत किंवा राज्य शासनास, नियोजन प्राधिकरणाने अर्ज केला असता, लेखी आदेशाद्वारे विनिर्दिष्ट करण्यात येईल अशा कालावधीत विकास योजनेचा मसुदा तयार करणे व विकास योजना तयार करण्यात आली आहे हे नमूद केलेली नोटीस राजपत्रात प्रसिध्द करणे आवश्यक आहे.

आणि ज्याअर्थी, संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उक्त नियोजन प्राधिकरणाची, उक्त अधिनियमाचे कलम २६, २८, २९, ३० अन्वयेची कर्तव्ये पार पाडण्याकरिता उक्त अधिनियमाच्या कलम १६२ अन्वये अधिकारी नियुक्त करण्याची विनंती शासनास केली आहे ;

आणि ज्याअर्थी, उक्त नियोजन प्राधिकरण उक्त प्रारुप विकास योजना राजपत्रात प्रसिध्द करुन विहीत मुदतीत शासनास मंजूरीसाठी सादर करणेबाबत उक्त अधिनियमाचे कलम २६, २८, २९ व ३० मधील तरतूदींचे पालन करण्यात कसूर करत आहे, असे राज्य शासनाचे मत झाले आहे;

आता, त्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम १६२ (१) अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारास अनुसरुन, उक्त प्रारुप विकास योजना राजपत्रात प्रसिध्द करुन विहीत मुदतीत शासनास मंजूरीसाठी सादर करणेसाठी उक्त नियोजन प्राधिकरणाची उक्त अधिनियमाचे कलम २६, २८, २९ व ३० अन्वयेची कर्तव्ये पार पाडण्यासाठी सहायक संचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक यांची अधिकारी म्हणून नियुक्ती करीत आहे.

टिप:- सदर फेरबदलाची अधिसूचना विभागाच्या www.urban.maharashtra.Gov.in या वेबसाईटवर देखील उपलब्ध आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(प्रदीप गोहिल)
कार्यासन अधिकारी

**Draft Development Plan – Shirdi (E.E.)**
Appointment of an Officer uder section 162 of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966.

**NOTIFICATION**

**Government of Maharashtra**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated: 26th April, 2010.**

***The Maharashtra Regional & Town Planning Act, 1966.***
**No. TPS-1609/571/CR-87/10/UD-9:-** Whereas, the Shirdi Nagar Panchayat (hereinafter referred to as' the said Planning Authority") has declared its intention to prepare Draft Development Plan of Shirdi (Extended Area) (hereinafter referred to as" the said Draft Development Plan') under the provision of section 38 read with sub-Section(1) of the Section 23 of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 [Maharashtra XXXVII of 1966] [hereinafter referred to as "the said Act"] and Notice of such declaration was published in the Maharashtra Government Gazette, Nashik Division, Part -I Supplement dated 6th September, 2001 ;

And whereas, in accordance with the provision of sub section (1) of section 26 of the said Act, the said Nagar Panchayat has to prepare the Development Plan (hereinafter referred to as "the said Development Plan") and publish a Notice of such preparation in the Official Gazette and in other prescribed manner not later than two years from the date of Notice of declaration of intention published under section 23 of the said Act, or within the further period extended by the State Government ;

And whereas, the Director of Town Planning requested to appoint an Officer under section 162 of the said Act to perform the duties of the said Planning Authority under section 26, 28, 29 & 30 of the said Act;

And whereas, the State Government is of the opinion that the Planning Authority has neglected to perform its duty imposed upon it under the provisions of the said Act in taking required actions under section 26, 28, 29 and 30 of the said Act for submission of the said Development Plan to Government for sanction within a specified time limit;

Now, therefore, in exercise of the powers conferred by sub section (1) of section 162 of the said Act, and all other powers enabling in that behalf, the Government of Maharashtra hereby appoints the Deputy Director of Town Planning, Nashik Division, Nashik to be an Officer for performing the duties of the said Planning Authority in taking required actions under section 26, 28, 29 and 30 of the

said Act for publication and submission of the said Draft Development Plan to Govt. for sanction within a specified time limit;

**Note** - This notification is also available on Department's web site www.urban.maharashtra.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

**(Pradeep Gohil)**
**Section Officer**